पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित
अर्थसंकल्पीय तरतूद सन २०१८-१९
मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने
(०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज
(२०४९ १२६८) भारित ४५, व्याज

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.२५०/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ९ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८
२. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे पत्र क्रमांकः मजीप्रा/वित्त-१/भनिनि व्याय/सुअंप्र/८५९/२०१८-१९, दि. २४ ऑक्टोबर, २०१८
३. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि.२०१८/प्र.क्र.१०/सेवा-६, दि. २६ एप्रिल, २०१८
४. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि.२०१८/प्र.क्र.१८/सेवा-६, दि. २८ ऑगस्ट, २०१८
५. शासन अधिसूचना, वित्त विभाग क्रमांकः भनिनि.२०१८/प्र.क्र.१८/सेवा-६, दि. ३ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

सन २०१८-२०१९ साठी महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१८ च्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांस विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिली असल्याचे वित्त विभागाने वाचा मधील अनुक्रमांक १ च्या परिपत्रकान्वये कळविले आहे.

२. सन १९८२-८३ पासून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे कार्यरत असलेल्या सर्व कर्मचारी / अधिकारी यांच्या भविष्य निर्वाह निधी पोटी प्राधिकरणाकडून प्राप्त होणारी वर्गणीची रक्कम / सांविधीक ठेव म्हणून लेखाशिर्ष-८३३६ नागरी ठेवी अंतर्गत शासनाकडे जमा करण्यात येते.

शासनाकडे मार्च अखेर एकूण जमा असलेल्या रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या व्याज दराने प्रचलित पद्धतीने लेखाशिर्ष २०४९ १२६८ अंतर्गत व्याज देण्यात येते.

३. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या ठेवीपोटी शासनाकडे मार्च, २०१८ अखेर एकूण रु.२६७,०६,५९,६९९/- (अक्षरी रुपये दोनशे सदुसष्ट कोटी सहा लाख एकोणसाठ हजार सहाशे नव्याण्णव फक्त) इतका निधी जमा आहे. सदर रकमेवर भविष्य निर्वाह निधीच्या प्रचलित व्याज दराने व्याजाची रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

आर्थिक वर्ष सन २०१८-१९ मधील माहे एप्रिल, २०१८ ते डिसेंबर, २०१८ या नऊ महिन्यांकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाचा खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचारी यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (२०४९ १२६८) भारित ४५, व्याज या लेखाशिर्षाखाली रु.१४,१५,२६,०००/- (अक्षरी रुपये चौदा कोटी पंधरा लाख सव्वीस हजार फक्त) इतकी व्याजाची रक्कम या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून होणारा खर्च हा पुस्तकी समायोजनाद्वारे समायोजित करावयाचा असून हा खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचा-यांच्या भविष्य निर्वाह निधीवरील व्याज प्रदान करण्यासाठी मागणी क्रमांक वाय-१, २०४९, व्याज प्रदाने (०१) (०१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कर्मचा-यांच्या भविष्यनिर्वाह निधीवरील व्याज (२०४९ १२६८) भारित ४५, व्याज या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखवून तो सन २०१८-१९ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी हा “८३३६-नागरी ठेवी, ८००-इतर ठेवी, (००) (०८) महाराष्ट्र पाणी पुरवठा व मलनि:सारण मंडळाच्या कर्मचा-यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६ ५०६७) ” या शिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने जमा करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे. सदर निधी भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाची रक्कम असून या निधीचे पुस्तकी समायोजन करण्यात येणार

असल्याने या शासन परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटी तसेच परिशिष्टामधील इतर अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०९१३१२२९२९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, street=WATER SUPPY AND SANITATION DEPARTMENT,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=0edd9c3872935c071332e1f94cbcdc9828471b3251eee2d5c23fd681ec41cefa, ou=WATER SUPPY AND SANITATION DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2019.01.09 17:29:17 +05'30'

**बाळासाहेब बा. हजारे**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
११. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३, अर्थ-१९, कोषा-५)
१२. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्यासन-१४११)
१३. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१४. निवड नस्ती कार्यासन पापु-२३